॥ श्रीगणेशाय नमः ॥

# श्रीकृष्ण बोध



एके समयीं परीक्षिति राजा, नित्यनैमित्तिक कर्मे करून जगदीशाचे गुणानुवाद श्रवण करीत बसला असतां, ज्यांनीं योगसाधनानें व तपाचरणानें ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठत्व मिळविलें व या अशाश्वत जगाशीं संबंध न ठेवण्याच्या इच्छेनें ज्यांनीं मातेच्या उदरांत बारा वर्षेपर्यंत वास केला असे जे त्रिकालज्ञ शुकमुनि ते तेथें अकस्मात् आले. राजानें त्यांना पाहतांच साष्टांग प्रणिपात केला आणि एका सिंहासनावर बसवून त्यांची यथासांग अर्घ्यपाद्य-पूजा केली. नंतर पंचपक्वान्नाचें भोजन झाल्यावर शुकमुनि सुप्रसन्न आहेत असें पाहून राजानें हात जोडून प्रार्थना केली कीं, हे कृपासिंधो, दीनदयाळा ! आपल्या कृपेनें नित्यशः वेद, स्मृति आणि पुराणें ऐकल्यानें माझें अंतःकरण शुद्ध व तजोमय झालें आहे; परंतु संसारांत नित्यशः कराव्या लागणाऱ्या गोष्टींपैकीं त्याज्य कोणत्या व पुण्यकारक कोणत्या, हें आपण सांगावें. परीक्षिति राजाची ही विनंती ऐकून शुकमुनि प्रसन्न मनानें म्हणाले, राजा, हा तुझा प्रश्न संसारी जनांस हितकर असून आज जसें तुझें मन शंकित झालें, त्याचप्रमाणें पूर्वी अर्जुनाच्याहि मनांत अशा प्रकारची शंका उद्भवली होती. त्यावेळीं भगवान श्रीकृष्णानें

जो त्यास बोध केला तो मी तुला कथन करतों, एकाग्र चित्तानें श्रवण कर; असें सांगून शुकमुनि म्हणतात :—

हे राजा, एके समयीं श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनाच्या भेटीकरितां प्रभातकालीं गेला असतां त्यास अर्जुन निजला आहे असें कंचुकीनें सांगितलें. तें ऐकून श्रीकृष्णास मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत अर्जुनास स्वप्नांत श्रीकृष्णदर्शन झाल्यामुळें तो खडबडून उठला. तोंच सेवकानें वसुदेवात्मज आल्याची वर्दी दिली. त्याबरोबर मोठ्या उत्सुकतेनें धांवत जाऊन अर्जुनानें प्रभुचरणीं लोटांगण घातलें आणि हात जोडून प्रार्थना केली कीं, हे सच्चिदानंदा जगदीशा, माझ्या हातून अज्ञानाच्या योगानें हा जो महान् अपराध घडला आहे तो क्षमा करून माझें रक्षण करा. हें ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना ! तूं मोठा ज्ञानी व बुद्धिमान आहेस. महत्प्रयासानें प्राप्त होणाऱ्या मनुष्यदेहास हा वेळपर्यंत निजणें उचित नाहीं. हें भगवंताचें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला, हे दीनानाथा ! सेवकाच्या हातून अज्ञानामुळें घडलेले अपराध क्षमा करा व या संसारांत अहितकारक कर्में कोणतीं व परमार्थसुख प्राप्त करून देणारीं कोणतीं तीं कृपा करून या दासास निवेदन करा. अर्जुनाचें हें लीनतेचें भाषण ऐकून श्रीकृष्णांनीं अर्जुनास नीति सांगितल्या, त्या अशा :—

**( नीति १ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, मनुष्यप्राण्यास सूर्योदय होईपर्यंत अंथरुणावर पडून राहणें उचित नाहीं.**

कारण सूर्योदय होण्याचे पूर्वी एक प्रहर रात्रीस सूर्यनारायणाचें

व दैत्यांचें तुंबळ युद्ध होऊन ऐशीं हजार दैत्यांचा वध करून सूर्य उदय पावतो आणि ते मृत दैत्यहि पुन्हा जिवंत होतात. ह्याकरितां प्रहर रात्र बाकी राहिली म्हणजे मनुष्यप्राण्यानें उठून दीनदयाळ परमेश्वराचें ध्यान व भजन करावें आणि अरुणोदयाच्या वेळीं स्नान करून श्रीसूर्यनारायणास अर्घ्यप्रदान देऊन नमस्कार करावा व पितृदेवतांचेंहि तर्पण करावें. अशा विधीनें वागणाऱ्या मनुष्यास श्रीसूर्यनारायण व पितृदेव जो जो आशीर्वाद देतात त्या योगानें तो मनुष्य इहलोकीं आणि परलोकीं उत्तम प्रकारें सुख भोगतो.

**( नीति २ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे कुंतीपुत्रा, आपल्या पलंगावर किंवा अंथरुणावर आपल्या विवाहित स्त्रीशिवाय दुसऱ्या मनुष्यास निजूं देणें पापमूलक आहे. कारण, विवाहित स्त्री आपली अर्धांगी असून पापपुण्याची वांटेकरीण आहे. परंतु दुसरें मनुष्य जर अंथरुणावर निजलें तर तेंहि आपल्या पापपुण्यास साथीदार होतें.**

हें ऐकून अर्जुन म्हणाला—हे कृपानिधे, आपल्या घरीं जर एखादा पाहुणा आला आणि दुसरें अंथरूण नसलें तर काय करावें ? श्रीकृष्ण म्हणाले—जर दुसरें अंथरूण नसेल तर ज्यानें त्यानें आपलें वस्त्र बिछान्यावर अंथरून निजलें असतां दोष लागणार नाहीं.

**( नीति ३ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, विधवा स्त्रीनें शिजवलेलें अन्न भक्षण करणें दोष-**

मूलक आहे. कारण पति मरण पावल्यानंतर स्त्रीहि अर्धमृत होते; ह्यास्तव तिच्या हातचें अन्न ग्रहण केलें असतां मुक्ति मिळणें दुर्लभ होतें.

( नीति ४ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, संध्याकाळच्या वेळीं घरापुढील आंगणें झाडणारा मनुष्य, अवश्य दरिद्री होतो.

कारण, त्यावेळीं प्रत्यक्ष लक्ष्मी घरोघर फिरत असते व ती ज्याच्या हातांत केरसुणी पाहते त्यास दरिद्री होशील असा शाप देते.

( नीति ५ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, एकादशी किंवा कोणतेंहि व्रत आचरून त्या दिवशीं स्त्रीशीं गमन करील तर त्यास त्या व्रताचें फळ प्राप्त होणार नाहीं.

हें ऐकून अर्जुनानें हात जोडून विनंती केली कीं, एखादी स्त्री व्रताचे दिवशींच ऋतुस्नात होऊन पांचवा दिवस आला असतां त्या दिवशीं तिच्याशीं गमन न केल्यास महत् पातक लागतें व गमन केल्यास व्रत निष्फळ होतें. तेव्हां व्रती मनुष्यानें काय करावें? हें ऐकून श्रीकृष्ण म्हणाले—अर्धी रात्र झाल्यानंतर ऋतुस्नात स्त्रीशीं गमन केल्यास दोष नाहीं. कारण रात्रीच्या शेवटचे दोन प्रहर दुसऱ्या दिवसांत गणले जातात.

( नीति ६ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, दीपकामध्यें एक वेळ पेटविलेली वात पुन्हां दुसरे

दिवशीं पेटविणें पापमूलक असून ह्या पातकाच्या योगानें त्या मनुष्याची स्त्री पुष्कळ दिवसपर्यंत वांझ राहील.

हें ऐकून अर्जुनानें प्रार्थना केली कीं, हे भगवान ! आपण जी नीति सांगतां त्यायोगें या दासाच्या अंतःकरणांत आनंद प्राप्त झाला आहे, यास्तव कृपा करून आणखी कांहीं आज्ञा करा.

( नीति ७ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, जो मनुष्य सूर्यनारायणासन्मुख उभा राहून तोंड धुवील किंवा जलाशयांत अथवा अग्नीमध्यें चूळ टाकील तो मनुष्य अंतकाळीं नरकवास भोगील. कारण सूर्य, अग्नि आणि जल ह्या तिन्ही देवता श्रेष्ठ असून प्रतिदिवशीं यांचें भजन करणें मनुष्य-प्राण्यास उचित आहे.

हें ऐकून अर्जुन म्हणालाः—हे घनश्यामा, प्रतिदिवशीं ह्या तिन्ही देवतांचें पूजन कोणत्या विधीनें करावें हें मला सांगा. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, प्रतिदिवशीं प्रातःकाळीं स्नान करून श्रीसूर्य-नारायणास तांब्याच्या भांड्यांत पाणी घेऊन अर्घ्यदान करावें, आणि मनःपूर्वक ध्यान धारणा करून रविवारीं व्रतस्थ राहावें. व्रतस्थ राहाण्यास अडचण असेल तर विधियुक्त सूर्यनारायणाचें पूजन करून उपवासी राहावें म्हणजे सूर्यदेवता प्रसन्न होऊन उत्तम प्रकारचा आशीर्वाद देते. जलदेवतेचें ध्यान करून थोडें दूध

अर्पण करावें व गंधपुष्पादिक यथायुक्त विधीनें पूजन करावें म्हणजे जलदेवता प्रसन्न होऊन उत्तम प्रकारचा कल्याणदायक आशीर्वाद देतात. तसेंच नित्यशः स्नान केल्यानंतर अग्निदेवतेचें ध्यान करून भोजनसमयीं विधियुक्त पूजन करावें व सर्व पदार्थांचा अग्निनारायणास नैवेद्य अर्पण करावा, म्हणजे अग्निदेवता सुप्रसन्न मनानें आशीर्वाद देते. सारांश, अशा रीतीनें वागणाऱ्या मनुष्यास ह्या तिन्ही देवतांच्या आशीर्वादेंकरून इहलोकीं सर्व प्रकारचीं सुखें प्राप्त होऊन अंतकाळीं वैकुंठवास प्राप्त होतो.

**( नीति ८ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, प्रज्वलित दीपक विझविणें व एका दिव्यावर दुसरा दिवा पेटविणें पापमूलक आहे.**

**( नीति ९ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, व्रती मनुष्य पलंग किंवा बाज यांजवर निजेल तर त्याचें व्रत निष्फळ होईल.**

कारण ज्या देवतेचें व्रत करावें. ती देवता व्रताचें दिवशीं व्रती मनुष्याच्या शरिरांत सदैव वास करते. ह्याकरितां व्रती मनुष्यानें शुचिर्भूतपणानें वागून एक वेळ फलाहार करावा. पलंगावर किंवा बाजेवर न निजतां, स्त्रीविरहित जमिनीवर निजावें म्हणजे व्रतदेवता प्रसन्न होतात अणि व्रतहि सफल होतें.

**( नीति १० ) श्रीकृष्ण म्हणतातः—हे अर्जुना, व्रताच्या दिवशीं आपलें उच्छिष्ट दुसऱ्यास देऊं नये.**

कारण, जो कोणी तें उष्टें खाईल तो आपल्या व्रताच्या फलांत वांटेकरी होईल व आपणांस दोष लागेल.

( नीति ११ ) श्रीकृष्ण म्हणतातः—हे अर्जुना, स्वयंपाक पूर्ण झाल्याशिवाय मध्येंच भोजनास बसणें किंवा अग्निनारायणास आहुति दिल्याशिवाय अन्न ग्रहण करणें, तसेंच पात्राशिवाय नुसतेंच अन्न जमिनीवर ठेवणें ह्या तिन्ही पातकांच्या योगानें मनुष्य सदा दरिद्री होईल. ह्याकरितां मनुष्यप्राण्यानें स्वयंपाक सिद्ध झाल्यावर शुचिर्भूत होऊन प्रथम अग्निनारायणास आहुति द्यावी. नंतर अन्नदेवतेस व गृहदेवतेस नैवेद्य समर्पण करून अतिथीस यथाशक्ति अन्न भाग अर्पण करावा आणि मग भोजन करावें म्हणजे अग्निदेवता, गृहदेवता व अन्नदेवता यांच्या आशीर्वादेंकरून तो मनुष्य सदा सुख भोगील.

( नीति १२ ) श्रीकृष्ण म्हणतातः—हे अर्जुना, तांब्याचें भांडें उष्टें करणें किंवा शौचास नेणें महत् पातक आहे.

कारण, सर्व धातूंमध्यें तांबें पवित्र असून तांब्याच्या भांड्यांत पाणी घेऊन स्नान केलें असतां गंगास्नानाचें पुण्य प्राप्त होतें

व पितृदेवतेस तांब्याच्या भांड्यानें जल अर्पण केलें असतां महत् पुण्य लागतें.

( नीति १३ ) श्रीकृष्ण म्हणतात:—हे अर्जुना, ब्रह्महत्या केली असतां किंवा परस्त्रीगमन केलें असतां हजार वर्षेंपर्यंत नरकवास प्राप्त होतो. तसेंच परस्त्रीगमनानें पुत्रप्राप्ति झाल्यास पुण्याचा क्षय होतो. पितृदेवता तर्पण—श्राद्धास विन्मुख होऊन अक्षय नरकवास भोगतात. कोणत्याहि पातकापेक्षां हें पातक वाईट मानलें आहे.

( नीति १४ ) श्रीकृष्ण म्हणतात:—हे अर्जुना, स्त्रीसंगानंतर स्नान न करितां जो मनुष्य अपवित्रतेनें राहतो त्याचें चालतांना पृथ्वीवर पडणारें प्रत्येक पाऊल पितृदेवतेच्या मस्तकावर दिल्याप्रमाणें होतें व या पातकाच्या योगानें त्यास नरकवास प्राप्त होतो.

( नीति १५ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, अमावास्येच्या दिवशीं झाडाची डाहळी किंवा पान तोडून त्यानें तोंड धुतलें असतां ब्रह्महत्येचें पातक लागतें.

( नीति १६ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, एखाद्या अतीत अभ्यागतानें आपणांजवळ कांहीं मागितलें असतां जर आपण त्याची यथाशक्ति मनकामना पूर्ण केली तर महत् पुण्य लागतें आणि जर त्याची निराशा केली तर पातक लागतें.

( नीति १७ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, मोडक्या वस्तु किंवा फुटकीं भांडीं घरामध्यें असणें हें दरिद्र प्राप्त होण्याचें लक्षण आहे.

( नीति १८ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, जेवतांना, पाणी पितांना, उठतांना, बसतांना, काम करतांना किंवा चालतांना जो मनुष्य परमेश्वराचें नामस्मरण करील तो या सुकृताच्या योगानें इहलोकीं आणि परलोकीं परम सुख भोगील. परंतु जो मनुष्य परमेश्वराचें स्मरण करणार नाहीं तो सदोदित दुःख भोगून पापापासून कधींहि मुक्त होणार नाहीं.

( नीति १९ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, कोणाहि मनुष्याबरोबर एका पात्रांत बसून भोजन करणें हें मोठें पाप होय.

कारण तो मनुष्य मागील जन्मीं कोणत्या जातीचा किंवा प्रकृतीचा होता हें आपणास माहीत नसल्यामुळें एके ठिकाणीं भोजन केल्यानें त्याची व आपली प्रकृति समान होते.

( नीति २० ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, भोजन करतेसमयीं मौन धारण करावें. कारण, अन्नदेवता त्यावेळीं आपल्या मुखामध्यें वास करीत असल्यामुळें तोंडानें जर असत्य भाषण किंवा परनिंदा केली तर अन्नदेवता शाप देते व त्यामुळें सर्व जन्मभर विपत्ति भोगावी लागते. ह्याकरितां मनुष्य प्राण्यानें भोजनसमयीं शुचिर्भूत राहून मनामध्यें अन्नदेवतेची स्तुति करावी, म्हणजे मनुष्य सर्वकाळ सुख भोगील.

हें ऐकून अर्जुनानें विनंति केली कीं, हे जगदीशा, भोजन-समयीं कोणाजवळ बोलणें अवश्य असलें तर कसें करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, जर कोणाजवळ बोलण्याची विशेष जरुरी असेल तर प्रथम पांच ग्रास ग्रहण केल्यानंतर आचमन करून जें बोलणें असेल तें बोलावें; परंतु असत्य भाषण किंवा परनिंदा मात्र करूं नये.

( नीति २१ ) श्रीकृष्ण म्हणतात :—हे अर्जुना, सुवर्तनीय विवाहित स्त्रीची निंदा करणें, विनाकारण तिचा छळ करणें किंवा ताडण करणें महापातक

होय. ह्या पापाच्या योगानें ह्या लोकीं फार क्लेश होऊन अंतकाळीं नरकवास प्राप्त होईल.

कारण, ज्यावेळेस विवाहित स्त्रीपासून पुत्रप्राप्ति होते त्यावेळीं त्या मनुष्याचे पितर उद्धरतात. मग ते पितर जरी नीचकर्मांच्या फळामुळें दुःख भोगीत असले तरीहि ते उद्धरतात व पुत्रपौत्रांस आशीर्वाद देतात. विवाहित स्त्री आपल्या पापपुण्याची वाटेकरीण आहे. आतां कदाचित् जर तिचा कांहीं गुन्हाच असेल तर मात्र तिला थोडेसें शासन करून सदुपदेश करावा. स्त्रीनें आपल्या भर्त्यास परमेश्वररूप समजून त्यास तन, मन, धन अर्पण करून त्याच्या सेवेंत सदासर्वदा तत्पर असावें. स्त्रियांना पतीशिवाय दुसरें दैवत नाहीं. पतिसेवा हेंच तिचें सत्कर्म आहे. ज्या स्थितींत आपणांस परमेश्वरानें ठेविलें असेल त्याच स्थितींत आनंदी वृत्तीनें राहिलें असतां त्या उभयतांसहि वैकुंठप्राप्ति होईल.

( नीति २२ ) अर्जुना, दिव्याच्या पडछायेंत पुरुषानें उभें राहणें दोषमूलक आहे.

( नीति २३ ) हे फाल्गुना, मूर्खपणानें किंवा दुसऱ्या कोणत्याहि कारणानें निरपराधी मनुष्यास मारणें पापमूलक असून नरकप्राप्तीचें साधन आहे.

( नीति २४ ) अर्जुना, अन्नशुद्धि केल्याशिवाय भोजन करणें अयोग्य असून प्रेतासमवेत भोजन केल्यासमान आहे.

कारण, अन्नशुद्धि केल्याशिवाय भोजनास बसलें असतां त्या अन्नास पिशाच्चें शिवतात. ह्याकरितां अन्न शुद्धि केल्याशिवाय अन्न ग्रहण करूं नये.

( नीति २५ ) अर्जुना, ज्या विस्तवानें दिवा लावला असेल त्याच विस्तवावर पाकनिष्पत्ति करणें अयोग्य आहे. कारण तो अग्नि प्रेतासमान असून अशुद्ध आहे.

( नीति २६ ) फाल्गुना, प्रातःकाळीं घराचा केर काढून तो घराबाहेरच्या आंगणांत टाकला असतां किंवा तसाच घरांत ठेविला असतां लक्ष्मीच्या शापानें असें कर्म करणारा थोडक्याच दिवसांत दरिद्री होईल.

( नीति २७ ) अर्जुना, विहिरीजवळ, नदी-जवळ किंवा तलावाजवळ किंवा कोणत्याहि जलाशयाजवळ बहिर्दिशेस जाणारा मनुष्य बहुत-करून नरकवास भोगील.

( नीति २८ ) फाल्गुना, प्रातःकाळीं किंवा संध्याकाळीं घराच्या दरवाजांत बसलें असतां पुण्याचा व संपत्तीचा क्षय होऊन ऋणवृद्धि होईल.

( नीति २९ ) अर्जुना, जो मनुष्य एकादशीचे

दिवशीं अन्न भक्षण करतो त्याचें जीवित पशुसमान आहे. त्यास अंतकाळीं पंचतत्त्वांची हत्या लागून तो बहुत काळपर्यंत नरकवास भोगील. ह्याकरितां मनुष्यमात्रानें एकादशीचे दिवशीं अवश्य उपवास करून सर्व दिवसरात्र जगच्चालक जो सच्चिदानंद दयाळु परमेश्वर त्याचे ध्यानांत निमग्न असावें. ह्यापासून पापक्षय होऊन पितृदेवास स्वर्गसुख प्राप्त होईल.

हें ऐकून अर्जुन म्हणालाः—हे श्रीकृष्णा, कदाचित् भूलचुकीनें एकादशीच्या दिवशीं कोणी अन्न भक्षण केलें तर त्या पापापासून तो कसा मुक्त होईल ? श्रीकृष्ण म्हणाले—अर्जुना, भोजनास बसलें असतां जर आज एकादशी आहे असें समजलें, तर ग्रास न घेतां पानावरून उठावें. असें केलें तर प्रत्यक्ष एकादशी केल्याचें श्रेय मिळून पितृदेव स्वर्गसुख भोगील. ज्या दिवशीं हरिदिन असेल त्या दिवशीं तांदूळ भक्षण करूं नयेत. कारण, रविवारीं व एकादशीचे दिवशीं तांदूळ खाणें व रविवारीं लोणी खाणें वर्ज्य करावें. हा नियम आजारी व ज्यांना व्रत होत नसेल त्यासहि लागू आहे.

( नीती ३० ) अर्जुना, रजस्वला स्त्रीशीं संग केला असतां त्या महापातकाच्या योगानें तो मनुष्यप्राणी संसारांत रोगग्रस्त होऊन अंतकाळीं

हजार वर्षेंपर्यंत नरकवास भोगील. कारण रजस्वला स्त्री पहिले दिवशीं चांडाळी, दुसरे दिवशीं ब्रह्म हत्यारी व तिसरे दिवशीं रजकीसमान होते. यास्तव-या तीन दिवसांत तिच्या वस्त्रांस स्पर्श केला असतां किंवा तिचें मुखावलोकन केलें असतां महापातक लागतें आणि जर तिच्या हातचें भोजन केलें तर भोजन करणारानें जितकें सुकृत केलें असेल तितक्याचा क्षय होतो. एवढ्याकरितां मनुष्यमात्रानें रजस्वला स्त्री चौथे दिवशीं स्नान करून शुद्ध झाली असतां तिच्याशीं रत व्हावें आणि चौथे दिवशीं स्त्रीसंग केला नाहीं तर पुत्र-हत्येचें पातक मस्तकीं चढतें.

हें ऐकून अर्जुनानें प्रश्न केला कीं, हें दयासिंधो, एखाद्या स्त्रीचा पति जर देशांतरास गेला असेल तर कसें करावें ? भगवान म्हणाले, जर पुरुष घरांत नसेल तर रजस्वला स्त्रीनें चौथे दिवशीं शुचिर्भूत स्नान करून सूर्यनारायणासन्मुख उभें राहून आपल्या पतीची मूर्ति ध्यानांत आणावी म्हणजे पुत्रहत्येच्या पातकापासून ती मुक्त होईल.

( नीति २१ ) अर्जुना, कोणाहि मनुष्यास कोण-ताहि पदार्थ खाण्याची इच्छा झाली असून जर तो पदार्थ त्यानें खाला नाहीं तर तो मनुष्य आजन्म-

पर्यंत सदा दुःखी आणि निराश राहील व मृत्युसमयीं त्या मनुष्याचा जीव इच्छित पदार्थांत वास करील.

हें ऐकून अर्जुन म्हणाला—हे नाथा ! निर्धन मनुष्यानें जीवाची प्रसन्नता कोणत्या प्रकारानें करावी ? श्रीकृष्ण म्हणाले, निर्धन मनुष्यानें रविवारीं, जन्मनक्षत्राच्या दिवशीं किंवा अमावास्येच्या दिवशीं श्रद्धापूर्वक मनेच्छित पदार्थांचें भोजन केलें असतां परमेश्वर त्याची मनकामना पूर्ण करील.

( नीति ३२ ) फाल्गुना, कोणाहि मनुष्यानें एखाद्या मनुष्यास एखादी वस्तु देण्याचें वचन दिलें असेल अथवा त्याचें देणें असेल तर तें द्यावें, न दिल्यास महापातक लागतें.

( नीति ३३ ) फाल्गुना, आपल्या पोटच्या मुलाचे पैसे घेऊन जो मनुष्य आपली मुलगी विकील तो या पातकाच्या योगानें सदा दरिद्री व दुःखी होऊन पितृदेवतर्पणापासून विन्मुख होऊन नरकवास भोगील.

( नीति ३४ ) फाल्गुना, कोणाहि मनुष्यानें एखाद्याजवळ कांहीं वस्तु मागितली आणि ती त्यानें दिली तर देणाऱ्या मनुष्यास अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होईल. कारण, पूर्णब्रह्म परमेश्वराच्या प्रसन्नतेच्या योगानें जीवाची प्रसन्नता जडते.

(नीति ३५) फाल्गुना, कोणी कोणाजवळ कांहीं वस्तु न मागणें हें उचित आहे. परमदयालु परमेश्वरानें मनुष्यमात्रास जें दिलें आहे त्यांतच त्यानें संतोषित असावें.

(नीति ३६) फाल्गुना, मनकामना पूर्ण होण्याकरितां चतुष्पाद सिंहासनावर बसून जो मनुष्य जगदीश्वराचें पूजन करितो त्याची पूजा फलदायक होणार नाहीं; याकरितां मनुष्यमात्रास उचित आहे कीं, स्वच्छतेनें पवित्र स्थानीं व्याघ्रांबर, मृगाजिन, ऊर्णावस्त्र अथवा दर्भासन घालून पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसून त्रैलोक्यनाथाचें पूजन आणि ध्यानधारणेकडे मन लावलें असतां फलदायक होईल.

(नीति ३७) हे फाल्गुना, जो मनुष्य गंगा, भागीरथी अथवा कोणत्याहि तीर्थाचें स्नान किंवा मूर्तींचें दर्शन करण्यास गेला असतां परस्त्रीकडे पापदृष्टीनें पाहील, तर त्या पापापासून तो प्राणी कधींहि मुक्त न होतां अंतकालीं दंडधराचे दूत त्या पापी मनुष्यास नरकवास भोगण्याकरितां घेऊन

जाऊन, लोखंडाची तापलेली सळई पापी मनुष्याच्या पोटांत घालतील. हें ऐकून फाल्गुन म्हणाला, हे वासुदेवा, जगद्गुरो ! कृपा करून आणखी कांहीं उपदेश करून अज्ञानांधकाराचा नाश करावा.

(नीति ३८) हे अर्जुना, तीर्थस्नानाकरितां वाहनारूढ होऊन गेलें असतां तीर्थाचें फल लाभत नाहीं.

( नीति ३९ ) हे अर्जुना, चार मंडळींत बसून एखादी वस्तु जो एकट्यानेंच भक्षण करील तो त्या पापापासून कधींहि मुक्त होणार नाहीं.

( नीति ४० ) अर्जुना, आदितवार, द्वादशी व अमावास्या या दिवशीं व्रतरक्षण करून खिचडी भक्षण करील तर तो प्राणी इतर पदार्थांपासून विन्मुख होऊन त्याची संतानवृद्धि होणार नाहीं.

( नीति ४१ ) अर्जुना, द्वादशीच्या दिवशीं पुराणपठण अथवा श्रवण करणें अगदीं अयोग्य आहे. कारण, त्या दिवशीं श्रीव्यास ब्रह्मदेवाच्या पूजनस्मरणांत निमग्न राहतात. एवढ्याकरितां त्या दिवशीं पुराणश्रवण अथवा पठण करूं नये.

( नीति ४२ ) हे अर्जुना, व्रतदिनीं अथवा आदितवारीं आरशांत पाहूं नये.

( नीति ४३ ) हे अर्जुना, ज्या पलंगावर आपण विवाहित स्त्रीशीं रममाण होतों तो पलंग अथवा बाज दुसऱ्या कोणास देणें महादोष आहे.

( नीति ४४ ) फाल्गुना, तीळ भक्षण करणें महादोष आहे. कदाचित् तीळ खाण्यांत आले असतां त्या दोषापासून मुक्त होण्यास ब्राह्मणास तिलदान करावें.

( नीति ४५ ) अर्जुना, लघवी केल्यावर लिंग-प्रक्षालन अवश्य करावें; नाहींतर त्या अघोरी-पणाच्या योगानें सुकर्मफलप्राप्ति होत नाहीं.

( नीति ४६ ) अर्जुना, एकचित्तानें आस्था-पूर्वक पुराण श्रवण केलें असतां वैकुंठवास होऊन अनेक सुखें मिळतील.

( नीति ४७ ) अर्जुना, अनामत ठेविलेल्या वस्तूचा अभिलाष केला असतां अंतकाळीं नरक-प्राप्ति होऊन संतानवृद्धि होणार नाहीं.

( नीति ४८ ) अर्जुना, विवाहित स्त्रीचा विना-पराध त्याग करून नीच स्त्रीशीं लंपट होणें किंवा गायीस बुजविणें, हें महत्पातक असून नरकप्राप्तीचें साधन आहे.

( नीति ४९ ) अर्जुना सावकार कर्ज मागण्याकरितां येऊन दारांत बसला असतां त्याजवर क्रोध करून आपण घरांत अन्न भक्षण केलें असतां त्यापासून तीन जन्म दरिद्री होईल.

( नीति ५० ) अर्जुना, आप्त व मित्राची हेळणा केली असतां महत्पातक लागतें.

( नीति ५१ ) अर्जुना, जो मनुष्य आपल्याच तोंडानें आपली स्तुति करतो किंवा दुसऱ्यानें स्तुति केली असतां हर्षित होतो तो अंतकाळीं नरकवास भोगील. याकरितां मनुष्यानें आपली स्तुति ऐकून हर्षित होणें अयोग्य आहे.

( नीति ५२ ) अर्जुना, बाग अथवा बागेंतील वृक्ष तोडणें अथवा तलाव किंवा विहीर मातीनें भरणें, तसेंच पठण केलेल्या विद्येची पुनरावृत्ति न करणें अथवा अनीतीनें चालणें. हीं सर्व कर्मे नरकवास प्राप्त होण्याचीं लक्षणें आहेत.

( नीति ५३ ) अर्जुना, आपले स्वतःचे किंवा परक्याचे बैल किंवा घोडे यांविषयीं अनास्था करणं किंवा त्यांची खाण्यापिण्याची व्यवस्था न

ठेवतां निष्ठुरपणानें वागणें ह्या पापासारखें दुसरें कोणतेंच पाप नसून ह्या पापाच्या योगानें दारिद्र्य प्राप्त होईल.

( नीति ५४ ) अर्जुना, जो मनुष्य रुपयांच्या बदली जमीन कबजांत घेईल तो या पापाच्या योगानें अंध होऊन त्याचे पुत्र ज्वानींत येऊन मरण पावतील.

( नीति ५५ ) अर्जुना, पिता अथवा वडील भाऊ किंवा आपल्यापेक्षां वयानें अधिक अशा मनुष्याशीं असत्यवचन बोलणें महत्पाप आहे.

( नीति ५६ ) अर्जुना, रानांत चरत असलेल्या गायीस हांकलणें किंवा बुझविणें महत्पातक असून तो मनुष्य मुक्ति न पावतां पुढल्या जन्मीं निपुत्रिक होईल.

( नीति ५७ ) हे किरीटि, जो मनुष्य आपल्या पित्याबरोबर किंवा स्वामीबरोबर युद्धसंग्राम करण्याकरितां रणांगणीं जाऊन तेथें स्वामीचा किंवा पित्याचा त्याग करून पळून जाईल तर त्याचें सर्व शरीर रोगग्रस्त होईल.

(नीति ५८) अर्जुना, गृहस्थाश्रम अवस्थेंत स्त्रीसहित गंगास्नान अथवा तीर्थस्नान न केलें तर त्या प्राण्याचें जिणें संसारांत नरकवासाप्रमाणें आहे. ह्याकरितां मनुष्यप्राण्यास उचित आहे कीं, स्त्रीसहित तीर्थस्नान करून श्रद्धेप्रमाणें दानधर्म करून अश्वमेधासमान पुण्य जोडावें. असें केलें असतां तो प्राणी सदा सुखी राहील.

हें ऐकून फाल्गुन हस्त जोडून म्हणाला, हे अंतर्ज्ञानी दयासिंधो! जर एखाद्या मनुष्याला स्त्रीसहित तीर्थस्नान करण्याची ऐपत नसेल तर त्यानें कसें करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, हे श्वेतवाहन, पौर्णिमेस, संक्रांतीस, पुष्यनक्षत्रीं, सिद्धियोगीं, अमावास्येस, जन्मनक्षत्रीं अथवा व्यतिपातादि शुभवारीं स्त्रीसहित नदी, तलाव, हौद अथवा विहीर यांजवर स्नान करून यथाशक्ति दानधर्म केला असतां पापमुक्त होऊन वैकुंठवास प्राप्त होईल.

(नीति ५९) फाल्गुना, दुसऱ्या मनुष्याचें गृहछिद्र व्यक्त करणें महापातक आहे.

(नीति ६०) फाल्गुना, व्यालेल्या गायीचें ८० दिवसपर्यंत दूध काढणें किंवा तिच्या वत्सास दूध पिऊं न देणें महत्पातक असून तो प्राणी निपुत्रिक होऊन नरकवास भोगील.

( नीति ६१ ) फाल्गुना, आपल्या मुलांना वाईट रीतीनें वागविणें, त्यांचे हाल करणें व त्यांना मारणें मोठें पाप आहे.

( नीति ६२ ) फाल्गुना, जो कोणी दुसऱ्याच्या हिश्शावर आपला वारसा चालवून तो कबजांत घेईल तर त्याची स्त्री व्यभिचारिणी होऊन संतान-वृद्धि न होतां त्याला चार जन्म अंधत्व येऊन अंतकाळीं दंडधराचे दूत तप्त स्तंभाशीं बांधून पुष्कळ मार देतील व नरककुंडांत टाकतील.

( नीति ६३ ) फाल्गुना, चंद्रग्रहणांत किंवा सूर्यग्रहणांत अन्न खाणें व पाणी पिणें किंवा घरांत पाणी भरणें दोषमूलक असून सूर्याच्या व चंद्राच्या शापानें त्या मनुष्यास संतानाचा व धनसुखाचा लाभ न होतां तो अंतकाळीं नरकवास भोगील.

( नीति ६४ ) फाल्गुना, बहिर्दिशेला जाऊन गुदप्रक्षालन करून जें पाणी शिल्लक राहील त्यांतच हातपाय धुणें दोषमूलक असून त्या कुटुंबास पिशाचोपद्रव होईल.

कारण, तें शेष पाणी पिशाचादिकाचा भाग आहे. ह्याकरितां असें करूं नये.

**( नीति ६५ ) फाल्गुना, ज्या मनुष्याच्या घरीं पुत्रसंतान नसेल त्या मनुष्याचा संसार तुच्छ आहे.**

हें ऐकून फाल्गुनानें प्रश्न केला कीं, हे स्वामिन्, पुत्रहीन मनुष्याला कोणाच्या हातून तर्पण पोहोंचेल ? फाल्गुनाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण हंसून म्हणाले, हे फाल्गुना, जी गोष्ट मला विचारलीस ती गोष्ट जाणण्यास देवहि असमर्थ आहेत, तथापि ज्याअर्थी तूं प्रश्न केलास त्याअर्थी सांगतों तें श्रवण कर. निपुत्रिक मनुष्याची स्त्री सुशील असून जर ती प्रीतिभावानें मन शुद्ध करून तर्पण आणि श्राद्ध करील तर तिच्या पतीला जल पोहोंचेल व अशा पुनीत स्त्रीच्या सुकर्मयोगानें त्याच्या सप्तपिढ्या उद्धरून जाऊन स्वतः तो जरी नरकवास भोगीत असला तरी वैकुंठधाम पावेल.

**( नीति ६६ ) अर्जुना, द्वादशी, अमावास्या व रविवार या दिवशीं अंगाला तेल मर्दन करणें महादोष आहे.**

**( नीति ६७ ) अर्जुना, घरवस्तीच्या शेजारीं पिंपळाचा वृक्ष लावणें गैर आहे.**

कारण कीं, प्रतिदिवशीं पितृदेव आपल्या पुत्राच्या घरीं एकवेळ येतात व आपले पुत्र कर्ममार्गानें वर्तन करून ब्राह्मणभोजन घालीत आहेत असें पाहून त्यास आशीर्वाद देतात; परंतु पिंपळाच्या वृक्षावरील देवता पितृदेवास येण्यास प्रतिबंध करतात. याकरितां पिंपळाचा वृक्ष राहाते घराशेजारीं कधींहि लावूं नये व त्याच्याखालीं घृतदीप लावूं नये.

(नीति ६८) अर्जुना, हा मनुष्यदेह अनेक आयासांनीं प्राप्त होतो असें असतां अहंकारव्याप्त होऊन या मायिक संसारांत वर्तन करणें अगदीं गैर आहे. या मनुष्यदेहास तीन अवस्था प्राप्त होतात. एक प्रथमची बाल्यावस्था, दुसरी तरुणावस्था, तिसरी वृद्धावस्था. बाल्यावस्थेंतील सर्व काळ क्रीडासुखांत निघून जातो. तारुण्यावस्था ऐषआरामादि सुखांत संपते आणि वृद्धावस्थेचा इंद्रियक्षीणतेनें अंत होतो. अशा या मानवी आयुष्याच्या तीन अवस्थांचा तीन प्रकारांनीं शेवट होतो. परंतु मनुष्यप्राण्याचें मुख्य कर्तव्यकर्म या तीनहि अवस्थांत होत नाहीं. तारुण्यावस्थेंत जर परमार्थप्राप्तीचा उद्योग केला नाहीं तर अंतकालीं नरकवास प्राप्त होतो. एवढ्याकरितां प्रत्येक जीवमात्रानें अहंकारादि षड्रिपूंचा त्याग करून जेणेंकरून परमार्थप्राप्ति होईल असें वर्तन ठेवावें हें त्यास उचित आहे.

(नीति ६९) अर्जुना, प्रत्येक मनुष्यप्राण्यानें दररोज पिंपळाचें व महादेवाचें पूजन करणें

अत्यावश्यक असून त्याप्रमाणें न केलें तर संसारांत त्या मनुष्याचें जिणें व्यर्थ आहे.

हें ऐकून लागलाच अर्जुनानें प्रश्न केला कीं, हे दयासिंधो ! जर मनुष्यास पिंपळाचें व महादेवाचें पूजन न घडलें तर त्यानें काय करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, किरीटि, जर कोणा मनुष्यास पिंपळाचें नित्य पूजन करणें न घडेल तर शनिवारीं तरी अवश्य करावें. कारण, या दिवशीं पिंपळाच्या वृक्षाच्या मुळाशीं ब्रह्मदेवाचा वास, मध्यभागीं विष्णूचा वास आणि अग्रभागीं महेशाचा वास असून प्रत्येक पानाच्या ठायीं देवतांचा वास असतो. याकरितां शनिवारचे दिवशीं पिंपळाची पूजा केली असतां सर्व देवता संतुष्ट होऊन आशीर्वाद देतील आणि फाल्गुन कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं श्रीशंकराची पंचामृतयुक्त षोडशोपचारें पूजा करून रात्रंदिवस महेशस्मरणांत मन निमग्न केलें असतां एक संवत्सरपर्यंत नित्य पूजन केल्याचें श्रेय प्राप्त होऊन अंतीं शिवलोकप्राप्ति होईल.

( नीति ७० ) अर्जुना, स्नान केल्यानंतर मोहाच्या व उंबराच्या वृक्षाखालून कधींहि जाऊं नये, गेलें असतां स्नानजनित पुण्यापैकीं चतुर्थांश पुण्य वृक्षास पोहोचतें, कारण ज्यावेळीं भगवंतांनीं नरसिंह अवतार धारण करून हिरण्यकशिपु दैत्याच्या वधानिमित्त आपल्या नखांनीं त्याचें पोट विदारिलें, तेव्हां त्याच्या पोटांतील ज्वालांनीं

नरसिंहाच्या नखांची फार आग होऊं लागली. तेव्हां भगवंतानें मोहाच्या व उंबराच्या पानांत आपलीं नखें रोविलीं व त्यामुळें आग शांत झाली. म्हणून प्रसन्नतेनें नरसिंहानें त्या दोन्ही वृक्षांस असा आशीर्वाद दिला कीं, कोणीहि मनुष्य जर स्नान करून तुमच्या छायेखालून जाईल तर त्याच्या स्नानसुकृतापैकीं चतुर्थांश फल तुम्हांस मिळेल.

हें ऐकून अर्जुन म्हणाला, हे भगवन् ! जर एखादा मनुष्य भूलचुकीनें ह्या वृक्षाखालून गेला तर त्यानें कसें वागावें ? श्रीकृष्ण म्हणाले, फाल्गुना, जर चुकून कोणी ह्या वृक्षाखालून स्नान करून जाईल तर त्यानें नरसिंहाच्या नांवाचा तीन वेळ उच्चार करावा. म्हणजे चतुर्थांश फळ वृक्षास पोहोंचणार नाहीं.

( नीति ७१ ) अर्जुना, स्नान झाल्यावर पलंगावर बसणें किंवा बाहेर जाऊन दुसऱ्या लोकांना भेटणें दोषमूलक आहे. कांहीं खाऊन जर ह्याप्रमाणें केलें तर हरकत नाहीं.

( नीति ७२ ) अर्जुना, आम्रवृक्ष किंवा बाग अथवा इतर वृक्ष तोडणें ब्रह्महत्येसमान आहे आणि वृक्ष लावल्याचें फल सहस्र यज्ञांसमान आहे. याकरितां मनुष्यप्राण्यास उचित आहे कीं,

त्यानें नूतन वृक्षाची लागवड करावी, नूतन वृक्षांवर मेघवर्षाव होऊन त्या वृक्षांच्या पानांवरून जितके जलबिंदु खालीं पृथ्वीवर पडतील, तितके यज्ञ केल्याचें फल प्राप्त होईल. याकरितां वृक्षाची लागवड करणें मनुष्यप्राण्यास उचित असून त्या मनुष्याच्या पांच पिढ्या वैकुंठधामाप्रत पावतील.

( नीति ७३ ) अर्जुना, जो मनुष्य तुळशीचा वृक्ष आपल्या घरीं लावून प्रतिदिवशीं स्नान करून तिची षोडशोपचारें पूजा करील व रात्रीं तुळशी-वृंदावनाजवळ दीप लावील त्याच्या घरीं दंडधराचे दूतांचा प्रवेश होणार नाहीं इतकेंच नव्हे तर त्याच्या घरीं लक्ष्मी वास करील व त्यास अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होईल. जर प्रतिदिवशीं तुळशीचें दर्शन न घेईल, तर कार्तिकमासीं तरी अवश्य करावें व आवळीच्या झाडाखालीं ब्राह्मणभोजन घालावें. असें केलें तर तेंहि अश्वमेधासमान पुण्यदायक आहे. परंतु रविवारीं आवळीपूजन करूं नये.

( नीति ७४ ) हे अर्जुना, अशुद्धतेनें व अश्रद्धेनें केलेलें तर्पण व श्राद्ध पितृदेवतांस पोंचत नाहीं.

( नीति ७५ ) अर्जुना, ज्याच्या घरीं वांझ स्त्री असेल त्याचा संसार नरकवासासमान आहे. वांझ स्त्रीच्या हातचें पाणी किंवा अन्न भक्षण करणें महादोष आहे. या पापापासून मुक्ति पावणें कठीण आहे.

हें ऐकून अर्जुन म्हणाला, हे भगवान् ! जर एखाद्या मनुष्याच्या कुटुंबांत वांझ स्त्री असेल आणि तिच्या हातचें खाण्याचा प्रसंग येईल तर या पापापासून तो कशी मुक्ति पावेल ? श्रीकृष्ण म्हणाले, भोजन करतेवेळीं परमेश्वरनामस्मरण करून प्रार्थना करावी कीं, हें माझें पाप नाहींसें करा; नंतर प्रत्येक घासास नामोच्चार करून भोजन केलें असतां पापस्पर्श न होतां धन व संतानवृद्धि होईल.

( नीति ७६ ) अर्जुना, एखाद्या मनुष्यानें आणलेलें पाणी त्याच्या हातांतून घेऊन पिणें दोषमूलक आहे; यास्तव दुसऱ्याच्या हातांतून पाण्याचें भांडें घेऊन अगोदर तें जमिनीवर ठेवावें व नंतर प्राशन करावें.

( नीति ७७ ) अर्जुना, एकवेळ ज्या पात्रांत आपण भोजन केलें तें पात्र धुतल्याशिवाय पुनः त्यांत अन्न घेऊन खाणें पापकारक असून अन्नदेवतेच्या शापानें असें करणारा मनुष्य दरिद्री होईल.

( नीति ७८ ) हे अर्जुना जो मनुष्य आपलें घर व घरासभोंवतालची आंगणें दररोज झाडून सारवून ठेवणार नाहीं तो महादेवाच्या व पितृदेवतांच्या शापानें सहा मासपर्यंत निर्धन होईल. गृह स्वच्छ न ठेवण्याचा अपराध जर पित्याकडून होईल तर पुत्र निर्धन होईल व स्त्रीकडून होईल तर पति नरकवास भोगील.

( नीति ७९ ) अर्जुना, नदी, तलाव अथवा विहीर ही सोडून घरीं स्नान करणें पापमूलक आहे. हें ऐकून अर्जुनानें प्रश्न केला कीं, हे दयासिंधो ! जर नदी, विहीर किंवा तलाव आसपास नसेल तर मनुष्यानें कसें करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, जर नदी, विहीर किंवा तलाव आसपास नसेल तर ज्या पाण्यांत हात बुचकळलेला नसेल असें पाणी स्नानास घ्यावें, म्हणजे तें गंगोदकासमान आहे आणि जर त्यांत हात घातलेला असेल तर तें पाणी मद्यतुल्य होतें. याकरितां ही गोष्ट लक्षांत ठेवणें फार अगत्याचें आहे.

( नीति ८० ) अर्जुना, जो मनुष्य स्नान करून तिलक लावणार नाहीं, त्याचें स्नान पशुतुल्य

आहे. स्नान करून गंध लावल्याशिवाय राहाणें दोषमूलक असून नरकवासाचें साधन आहे.

( नीति ८१ ) अर्जुना, कोणतीहि चिंता मनांत धरून उदास राहणें गैर आहे. जें भवितव्य असेल त्याप्रमाणें होणार, या गोष्टीवर भरंवसा ठेवून एकाग्र चित्तानें भगवन्नामस्मरण करणें मनुष्य-प्राण्यास उचित आहे.

( नीति ८२ ) अर्जुना, मनुष्यमात्रानें नित्य दधिभोजन करणें हितकारक आहे. कारण, हा मानवदेह बहुत प्रयासानें प्राप्त होतो. जर प्रति-दिवशीं दधिभोजन न मिळेल तर प्रतिपौर्णिमेस तरी दधिभोजन अवश्य करावें.

( नीति ८३ ) अर्जुना, मसूर, वांगें आणि लसूण खाणें गैर आहे. कारण या तीन जिनसा मनुष्याच्या पोटांत २१ दिवसपर्यंत जशाच्या तशाच राहतात. ह्या तीन पदार्थांपैकीं जर एखादा पदार्थ भक्षण केला आणि मनुष्य मृत्यु पावला तर त्या प्राण्यास नरकवास प्राप्त होईल.

**हें ऐकून अर्जुनानें प्रश्न केला कीं, हे दयासिंधो ! जर अजाण-पणानें ह्या तिहींपैकीं एखादा पदार्थ भक्षण केला तर कसें करावें ?**

श्रीकृष्ण म्हणाले, जर तिहींपैकीं एखादा पदार्थ भक्षण केला तर त्यावर गंगाजळ प्यावें म्हणजे दोषनिवृत्ति होईल.

( नीति ८४ ) अर्जुना, अष्टौप्रहर घरांत दिवा जळत असून मध्यें जर तो न विझेल तर त्या मनुष्याचे पितृदेव प्रसन्न होऊन आशीर्वाद देतील व त्या आशीर्वादाच्या योगानें धनसंतानवृद्धि होऊन पुढच्या जन्मीं परमेश्वरकृपेनें धनसंतानसुख पावून अंतकालीं वैकुंठवास प्राप्त होईल.

( नीति ८५ ) अर्जुना, जो मनुष्य भोजन करून राहिलेलें अन्न पुनः खाईल अथवा दुसऱ्यास खावयास देईल तो महादोषी होईल.

( नीति ८६ ) अर्जुना, जो मनुष्य अंधारांत भोजन करील किंवा भोजन करीत असतां दिवा गेला तरी तसाच अंधारांत जेवत राहील तो या दोषाच्या योगानें धनसंतानसुखास पराङ्मुख होईल. अंधारांत भोजन करणें हें प्रेताबरोबर भोजन करण्यासमान आहे.

( नीति ८७ ) फाल्गुना, आपल्या डोक्यावर घालण्याचें पागोटें दुसऱ्यास घालावयास देणें महा-

दोष आहे. कारण असें केलें असतां देणाराची बुद्धि मंद होऊन घेणाराची बुद्धि वृद्धिंगत होते.

( नीति ८८ ) अर्जुना, दक्षिण दिशेस पाय करून निजणें फार अशुभ आहे.

( नीति ८९ ) फाल्गुना, मुलीला ४ थें वर्ष लागलें म्हणजे ती पार्वती व ६ वें लागलें म्हणजे कन्या असें समजावें. जो मनुष्य आपल्या मुलीचें अशा स्थितींत लग्न करील त्यास मोठ्या यज्ञाचें फल प्राप्त होईल आणि १२ वें वर्ष लागलें असतां लग्न करणें महादोष आहे.

( नीति ९० ) अर्जुना, डोक्याला वस्त्र गुंडाळलेलें असून कच्छमुक्त असणें दोषमूलक आहे. अशा मनुष्याचे पितृदेव नरकवासांत जाऊन स्वतः तोहि नरकवास भोगील. कारण अशा मनुष्याचें पाऊल धरित्रीवर पडणें म्हणजे गायीच्या अंगावर पाय देण्यासारखें आहे.

( नीति ९१ ) फाल्गुना, शिळ्या उदकानें तर्पण केलें असतां अंतकाळीं घोर नरकवास प्राप्त होऊन पितृदेवास तें तर्पण पोहोंचत नाहीं.

( नीति ९२ ) अर्जुना, हातांत, कानांत किंवा गळ्यांत सुवर्णालंकार घालणें उत्तम फलदायक आहे कारण स्नान करते समयीं त्या सुवर्णास स्पर्श झालेलें उदक गंगोदकासमान आहे.

( नीति ९३ ) अर्जुना, गंगेमध्यें अथवा कोणत्याहि तीर्थामध्यें स्नान करण्याचे अगोदर वस्त्र धुणें महत्पातक आहे.

( नीति ९४ ) अर्जुना, कुटुंबांतील कोणताहि मनुष्य जरी गंगास्नानास गेला तरी त्यानें गंगास्नान करून तर्पण केलें असतां पितृदेव संतुष्ट होऊन सर्व कुटुंबास उत्तम आशीर्वाद देतात.

( नीति ९५ ) फाल्गुना, एखादा आजारी मनुष्य श्रीक्षेत्रीं मृत्यु पावला असतां त्याचें प्रेत अर्धवट जाळून तीर्थांत टाकूं नये; असें केलें असतां नरकवास प्राप्त होतो. याकरितां मृतमनुष्याचें प्रेत पूर्ण जाळून सप्तदिवसपर्यंत त्याच्या रक्षेस गायीशिवाय इतर कोणाचाहि स्पर्श किंवा स्त्रीची सांवली पडूं न देतां आठवे दिवशीं शुचिर्भूत स्नान करून मृत मनुष्याची रक्षा तीर्थांत टाकावी

व ज्या जागेवर प्रेत दहन केलें असेल ती जागा गायीच्या शेणानें स्वच्छ सारवावी. असें केलें असतां मृतास वैकुंठवास प्राप्त होतो.

( नीति ९६ ) फाल्गुना, मेघ वर्षत असतां सूर्योदय होईल त्या वेळीं स्नान केलें असतां गंगास्नानाचें फल प्राप्त होतें. अशा प्रकारचें स्नान देवांदिकांसहि दुर्लभ आहे.

( नीति ९७ ) फाल्गुना, सूर्यास्ताच्या वेळीं भोजन करणें, पाणी पिणें किंवा बहिर्दिशेस जाणें महादोषकारक आहे.

कारण, ज्या वेळीं सूर्यास्त होतो, त्यावेळीं सूर्याचें आणि दैत्यांचें युद्ध होत असतें. ह्यास्तव त्यावेळीं मनुष्यानें ईश्वरस्तवनाशिवाय दुसरा कोणताहि व्यवसाय करूं नये. ज्यावेळीं अर्धसूर्यास्त होतो त्यावेळीं अर्घ्यप्रदान केलें असतां सूर्यनारायण संतुष्ट होऊन आशीर्वाद देताता. सूर्यास्तसमयीं नीच कर्म केलें असतां पुष्कळ वर्षें निर्धनत्व प्राप्त होतें इतकेंच नव्हे, तर सूर्यास्त होण्याच्या पूर्वी चार घटका, अस्तानंतर चार घटका आणि सूर्योदयापूर्वी चार घटका व उदयानंतर चार घटका निजून राहाणें महादोष आहे. अशावेळीं परमेश्वरस्मरण व जगदीशाची ध्यानधारणा केली असतां सर्व पापांचा क्षय होऊन अंती वैकुंठवास प्राप्त होतो.

( नीति ९८ ) अर्जुना, हातामध्यें भाकरी घेऊन खाली असतां थोडक्या काळांत दरिद्र प्राप्त होतें.

( नीति ९९ ) अर्जुना, धनसंपत्ति व संतान ह्यांची अतितृष्णा व हेवा केला असतां निर्धनत्व प्राप्त होऊन अंतीं नरकवास व पुढच्या जन्मीं निपुत्रिकत्व प्राप्त होतें.

( नीति १०० ) फाल्गुना, पोटीं पुत्रसंतान नसेल तर संसारांत मानमान्यता न मिळतां अंतीं नरकवास प्राप्त होतो.

( नीति १०१ ) फाल्गुना, स्त्री प्रसूत झाल्या-वर ४५ दिवसपर्यंत तिच्या हातचें उदक प्राशन करणें किंवा अन्न खाणें नरकवासाचें साधन असून त्या मनुष्याचे पितृदेव जरी वैकुंठवास भोगीत असले तरी नरकवास भोगतील.

हें ऐकून फाल्गुनानें प्रश्न केला कीं, दीनानाथा, एखादा मनुष्य जर घरचा एकटा असला तर त्यानें कसें करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, तेरा दिवसांनंतर किंवा तेवीस दिवसांनंतर स्त्रीनें गंगास्नान केल्यावर तिच्या हातचें अन्न किंवा पाणी ग्रहण करण्यास हरकत नाहीं. हें ऐकून फाल्गुन चकित होऊन दोन्ही हात जोडून आणखी कांहीं आज्ञा सांगण्याविषयीं प्रार्थना करूं लागला असतां देवादिकांस अगम्य अशा आज्ञा श्रीकृष्ण त्यास सांगूं लागले.

( नीति १०२ ) फाल्गुना, प्रसन्न चित्तानें कोणतेंहि कृत्य केलें असतां तें अधिक फलदायक

होतें. उदासवृत्तीनें व क्रोधानें केलेलें पुण्य फलदायक न होतां उलट पातक मात्र लागतें.

( नीति १०३ ) फाल्गुना, आपला पोटचा मुलगा दुसऱ्यास दत्तक दिला असतां त्यानें केलेलें तर्पण आपणांस पोंचत नाहीं. दत्तक दिलेला मुलगा परत घेतला असतां पुढच्या जन्मीं धनसंतानसुख न मिळतां नरकवास प्राप्त होईल.

हें ऐकून अर्जुनानें प्रश्न केला कीं, हे सच्चिदानंद स्वामिन् ! एखाद्या मनुष्यानें अज्ञानानें आपला दिलेला पुत्र परत घेतला तर तो त्या पापापासून कसा मुक्ति पावेल ? श्रीकृष्ण म्हणाले, फाल्गुना, त्या मनुष्यानें स्त्रीसहित व पुत्रासहित गंगेंत स्नान करून पांच रंगाच्या पांच दुभत्या गायी घेऊन त्यांचे खूर, पृष्ठ व शिंगें सुवर्णानें मढवून त्या गायी सत्पात्र ब्राह्मणास दान कराव्यात व परब्रह्म परमेश्वराचें ध्यान करून अपराध क्षमा करण्याविषयीं त्याची प्रार्थना करावी.

( नीति १०४ ) फाल्गुना, युद्धप्रसंगीं धनसंपत्तीच्या गर्वानें व बलगर्वानें मदोन्मत्त होऊन शत्रूला वाग्बाणानें ताडण करील तर त्याचें सर्व बळ नष्ट होऊन तो रणांगणीं नष्ट होईल.

( नीति १०५ ) फाल्गुना, रणांगणीं युद्ध

करीत असतां शत्रू बलहीन होऊन शरण येईल तर त्यास जीवदान द्यावें; परंतु जर त्यास जीवदान न देतां ठार मारलें तर या पातकाच्या योगानें पुत्रसंतानाचा नाश होऊन पुढल्या जन्मीं त्याची स्त्री वांझ राहील.

( नीति १०६ ) फाल्गुना, कागदावर अथवा लांकडावर मनुष्याचें किंवा जनावराचें चित्र काढणें हा महादोष असून त्या दोषाच्या योगानें या जन्मांत व पुढच्या जन्मांत धनसंतानसुख प्राप्त होणार नाहीं व डोळ्यांस अंधत्व प्राप्त होईल; परंतु परमेश्वराची किंवा सत्पुरुषाची प्रतिमा कागदावर किंवा लांकडावर काढून त्याची प्रतिष्ठा केली तर धनसंतानसुखाची वृद्धि होईल.

( नीति १०७ ) फाल्गुना, बोलतांना आपल्या तोंडांतील थुंकी दुसऱ्याच्या अंगावर उडेल तर पुढल्या जन्मीं डुकराचा देह प्राप्त होऊन अंतकाळीं नरकवासी होईल.

( नीति १०८ ) फाल्गुना, जो मनुष्य आपल्या धन्याच्या आज्ञेचा अवमान करील तो सदा दुःखी

होऊन अंतीं नरकवास भोगील. कारण स्वामीची अवज्ञा करणें महत्पातक आहे.

हें ऐकून फाल्गुनानें प्रश्न केला कीं, हे यदुनाथा ! जर स्वामी, सेवकाकडून एखादें काम न होईल अशी आज्ञा करील तर ह्या पापापासून तो चाकर कसा मुक्त होईल ? श्रीकृष्ण म्हणाले, फाल्गुना, सेवकास सांगितलेली कठीण चाकरी जितके दिवस सेवकाकडून होणार नाहीं तितक्या दिवसांचा पगार जर चाकरानें धन्यापासून घेतला नाहीं, तर तो सेवक त्या पापापासुन मुक्त होईल. फाल्गुन म्हणाला, स्वामीन् ! जर स्वामी निर्धन होऊन सेवकाचा पगार देण्याचें सामर्थ्य त्याजला न राहील तर त्यानें कसें करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, फाल्गुना, सेवकाच्या राहिलेल्या पगाराचा चतुर्थांश दानधर्म करून अपराधाच्या क्षमेबद्दल परमेश्वराची प्रार्थना केली असतां त्या पापापासून मुक्त होईल.

( नीति १०९ ) फाल्गुना, हवेली, तलाव, विहीर आदिकरून ठिकाणें तयार करण्यापासून महत्पुण्य आहे, परंतु हीं वरील ठिकाणें अर्धवट तयार करून त्यांच्या ठिकाणीं भोजन करणें महत्पातक आहे. यास्तव जेव्हां वरील ठिकाणें संपूर्ण कुटुंबासहित भोजन केलें असतां अश्वमेधयज्ञाचें फल प्राप्त होऊन धनसंतानसुख प्राप्त होईल.

(नीति ११०) फाल्गुना, महायात्रा अथवा तीर्थस्नान किंवा देवदर्शन करण्यास जात असतां वाटेनें मेजवान्या घेत जाणें महादोष आहे. या दोषापासून मनुष्यप्राणी संसारांतील सर्व वस्तूंस विन्मुख होऊन यात्रा, स्नान किंवा देवदर्शन श्रेयस्कर होणार नाहीं.

हें ऐकून फाल्गुनानें प्रश्न केला कीं, हे भगवन्, भक्तवत्सला! महायात्रेस अथवा तीर्थस्नानास किंवा देवदर्शनास जात असतां वाटेंत भाऊबंद किंवा नातेवाईक अथवा इष्टमित्र असेल आणि त्यांनीं मेजवानीस बोलाविलें तर कसें करावें? श्रीकृष्ण म्हणाले, फाल्गुना, यात्रेस जातांना कोणाकडेहि जाऊं नये, येतांना गेलें असतां दोष नाहीं. परंतु देवस्थानावर किंवा तीर्थावर गेलें असतां इष्टमित्राच्या आग्रहानें जर मेजवानीस जाण्याचा प्रसंग आला तर जें अन्न भक्षण केलें असेल त्याच्या वीसपट अन्न ब्राह्मणास दिलें असतां दोषमुक्त होऊन फलप्राप्ति होते.

(नीति १११) फाल्गुना, ज्यांच्या अंगावर पिसें आलीं नाहींत अशा पक्ष्यांच्या पोरांना त्यांच्या घरट्यांतून बाहेर काढणें महत्पातक असून ह्या पातकाच्या योगानें दारिद्र्य प्राप्त होऊन मृत्यु येईल आणि अंतकाळीं नरकवास प्राप्त होईल व पुढच्या जन्मीं धनसंतानसुख प्राप्त होणार नाहीं.

कारण, मनुष्याचा स्पर्श पक्ष्याच्या पिलांना झाला असतां पक्षी त्यांस स्पर्श न करतां त्यांचें पालनपोषण करीत नाहींत. अशी त्यांची आबाळ झाली म्हणजे तीं भुकेनें व संगोपनाच्या आबाळेमुळें प्राणत्याग करतात व हें पातक त्या मनुष्याच्या माथीं चढतें.

( नीति ११२ ) फाल्गुना, गोदोहन करीत असतां गायीच्या अंगावरचा केंस तुटून पडला असतां महादोष असून दूध गाळल्याशिवाय पिणें दोषार्ह आहे. एवढ्याचकरितां मनुष्यानें दूध गाळून ऊन करून प्यावें.

( नीति ११३ ) फाल्गुना, जो पुरुष अथवा स्त्री मुलांना रडत ठेवून कुकर्मप्रवर्तक होईल व त्यांस मारील तर त्यास नरकवास प्राप्त होईल व सर्व पदार्थांपासून विन्मुख होऊन निपुत्रिक होईल. कदाचित् मुलें असल्यास तरुणपणीं मृत्यु पावतील आणि पितृदेव नरकवास भोगतील.

( नीति ११४ ) फाल्गुना, मुखप्रक्षालन केल्याशिवाय पान किंवा दूध अथवा कोणतीही वस्तु भक्षण अथवा प्राशन केली असतां पुष्कळ दुःख भोगावें लागतें.

( नीति ११५ ) फाल्गुना, कोणत्याहि वृक्षाचें अपक्क फळ तोडणें महत्पातक आहे.

( नीति ११६ ) फाल्गुना, नोकरलोकांचा पगार न देणें किंवा उपकारकर्त्यांचें उतराई न होणें हें महत्पातक असून तो प्राणी निपुत्रिक होऊन अंतकाळीं नरकवास भोगील आणि त्याचे पितृदेव स्वर्गवासी असल्यास नरकवास भोगतील.

( नीति ११७ ) फाल्गुना, जी वस्तु ब्राह्मणास दान करावयाची असेल ती वस्तु एखाद्या पात्रांत घालून तें पात्र हातांत घेऊन ब्राह्मणानें तथास्तु म्हटल्यावर वस्तु, पात्र आणि हात यांजवर ब्राह्मणाची सत्ता होते. अशी सत्ता झाल्यावर दानाची वस्तु, पात्र व हाताच्या ऐवजीं सोनें, रुपें अथवा तांबें ह्याचा हात करून ब्राह्मणास द्यावा. असें जर न केलें तर हातानें कोणत्याहि प्रकारचें केलेलें सुकृत फलद्रूप होत नाहीं.

हें ऐकून फाल्गुनानें प्रश्न केला कीं, हे दयासिंधो ! जर एखाद्या मनुष्यास असें करण्याचें सामर्थ्य नसेल तर त्यानें कसें करावें ? श्रीकृष्ण म्हणाले, असें करण्याचें जर सामर्थ्य नसेल तर एखादें वस्त्र सत्पात्र ब्राह्मणास दिलें असतां योग्य होईल.

(नीति ११८) फाल्गुना विधुर मनुष्यानें दुसरें लग्न केलें असतां संसारांत त्यास फारशी सुखप्राप्ति होणार नाहीं.

फाल्गुनानें प्रश्न केला कीं, असें होण्याचें कारण काय ? श्रीकृष्ण म्हणाले, निपुत्रिक विधुरानें दुसरें लग्न केल्यास फारशी हरकत नाहीं. पण ज्याला पुत्रसंतान असून त्यानें जर दुसरें लग्न केलें तर नवी स्त्री पूर्वी झालेल्या मुलाचें ममतेनें संगोपन करीत नाहीं. असें झालें म्हणजे त्या मुलाचे शाप पित्याच्या शिरावर बसतात.

(नीति ११९) फाल्गुना, जारकर्म करणें व खोटें बोलणें हीं दोन कर्मे निषिद्ध असून ह्यापासून धनवृद्धि न होतां नरकप्राप्ति मात्र होते.

(नीति १२०) फाल्गुना, भाट, भांडखोर व लबाड ह्या तिन्हीपैकीं कोणालाहि कांहीं देणें घोर नरकाचें साधन आहे. कारण हे तिन्ही प्रकारचे मनुष्य मिथ्यावचनी, अपकीर्तिवर्धक व स्तुतिपाठक आहेत. लाज, काज, गृह, बुद्धि इत्यादि गुण ह्यांचे ठायीं पूर्णपणें वसत असल्यामुळें ह्यांस धन देणारास अंतीं नरकवास प्राप्त होऊन पुढच्या जन्मीं ह्या तिन्ही प्रकारच्या जन्मां-

तून कोणता तरी एक जन्म होतो. यास्तव त्यांस धन देणें दुःखमूलक आहे.

( नीति १२१ ) हे फाल्गुना, बहिर्दिशा अथवा लघवी करून आल्यावर स्नान केल्याशिवाय कोणतेंहि दान किंवा पुण्य केलें असतां तें फलद्रूप न होतां अंतीं नरकवास प्राप्त होतो.

( नीति १२२ ) किरीटि, चौथे दिवशीं हातापायांचीं नखें न काढलीं तर अथवा सातवे दिवशीं स्मश्रु न केली तर त्यानें केलेलें शुभकृत्य निष्फळ होईल.

( नीति १२३ ) फाल्गुना, चतुर्दशी व अमावास्या किंवा रविवार व मंगळवार ह्या दिवशीं जन्मलेल्या मनुष्यानें त्या दिवशीं हातापायांचीं नखें काढणें पापमूलक आहे. करितां त्यादिवशीं निरनिराळ्या देवतांचीं पूजनें करावीं. त्यामुळें धनसंतति प्राप्त होऊन अंतीं वैकुंठवास प्राप्त होईल.

(नीति १२४) फाल्गुना, आदल्या दिवसाचें शिळें अन्न भक्षण केलें असतां शरीरप्रकृति रोगग्रस्त होऊन अंतीं नरकवास प्राप्त होतो व संतति दुःखी होते.

हें ऐकून फाल्गुनानें प्रश्न केला कीं, हे भगवन् ! ह्या पापापासून मुक्तता कशी होईल ? श्रीकृष्ण म्हणाले, गोड पदार्थ आणून तो शिळा खाल्ला असतां हरकत नाहीं, परंतु शिळें अन्न मात्र खाऊं नये. कारण त्यापासून रोग उत्पन्न होऊन बुद्धिमांद्य, आळस, निद्रा ह्यांची वृद्धि होते.

**( नीति १२५ ) किरीटि, स्वामिसेवेंत निरालस्यता ठेवणें व लोभ न करणें, दुसरें सेवकावर प्रीति करणें व तिसरें क्रोध न करणें, ह्या तीन गोष्टी चांगल्या लक्षांत वागविल्या असतां या लोकीं व परलोकीं सुखप्राप्ति होते.**



## बालक्रीडेंतील श्लोक

करी कौतुक गोकुळीं चक्रपाणी ॥ रडे बाळक माय पुसे सुजाणी ॥ तुला आवडे काय चित्तीं मुकुंदा ॥ म्हणे यशोदा बा रे पुरवीन छंदा ॥ १ ॥ जरी आवडे दूध साई तुला रे ॥ दहीं भात पोळी मला सांग बा रे ॥ अरे दुग्ध आटीव कीं अन्न व्हावें ॥ मला सांग रे काय बा तें करावें ॥ २ ॥ न बोलेचि कांहीं हरी एक दोनी ॥ रडे ओरडे मागुती चक्रपाणी ॥ म्हणे माउली नीज बा कान्हया रे ॥ तुला सांगते गोष्टि त्या तान्हया रे ॥ ३ ॥ म्हणे गोपिका अंगणीं आलिया रे ॥ तुला खेळवूं मागती जाण बा रे ॥ असे आलि राधा तुला मागताहे ॥ असें ऐकतां कृष्ण ऊठोनि पाहे ॥ ४ ॥ मला दावि माते कशी कोण राधा ॥

कडे घेउनी द्वारिं आलि मुकुंदा ॥ हरी हेचि राधा वरी पाहे बा रे ॥ म्हणे द्यावा मामी करी हात म्होरे ॥ ५ ॥ तिला पाहता सावळा झेंप घाली ॥ हरी पाहुनी राधिका ते निवाली ॥ कडे घेउनी राधिका बैस खालीं ॥ हरी पाहुनी कामनातूर झाली ॥ ६ ॥ कडें घेउनी खेळवी ते सुजाणी ॥ उगा राहिला ना रडे चक्रपाणी ॥ म्हणे माउली यास नेई घरा गे ॥ रडे आक्रोशें काम नेदी करूं गे ॥ ७ ॥ मला काम आहे घरीं फार मामी ॥ जरी हा रडेल करूं काय ही मी ॥ यशोदा म्हणे तूंही नेई तयाला ॥ पाजोनि दुग्धा नीजवी गे मुलाला ॥ ८ ॥ हरी घेउनी राधिका ते निघाली ॥ घरीं आलिया वृद्ध हाटासि गेली ॥ असे सासुरा तोहि गांवासि गेला ॥ तिचा कांत तो गायी चारूं निघाला ॥ ९ ॥ अशा भावनें अंग शेजेसि घाली ॥ त्वरें चालतां कंप कंपीत झालीं ॥ मूर्च्छा दाटलीं व्याकुळ सुंदरीतें ॥ तिचें चित्त त्या जाणिलें गोपीनाथें ॥ १० ॥

## छंद

व्याकुळ चित्त हें पाहुनी मती । वाढला त्वरें लक्षुमीपती ॥ वस्त्र भूषणें शोभला हरी । तेज फाकलें फार मंदिरीं ॥ ११ ॥

## श्लोक

हरीरूप सौंदर्य हें तेज काया ॥ वर्षें षोडश दिव्यरूपें रमाया ॥ म्हणे तो हरी पाहिं आतां सखे कीं ॥ तया पाहतां पल्लवी मूख झाकी ॥ १२ ॥ उठे सुंदरा आड लाजोनि राहे ॥ निवे अंतरीं कृष्णचारित्र्य पाहे ॥ धरी पल्लवीं तो हरी राधिकेसी ॥ सवें घेउनी चालिला मार्ग नेसी ॥ १३ ॥ हरी स्पर्शता मंचकीं आलि राधा ॥ रमे कौतुकें सौख्य झालें मुकुंदा ॥ म्हणे तो हरी पाहि आतां सखे

कीं, ॥ असें ऐकतां पळवें मुख झाकी ॥ १४ ॥ असें क्रीडतां कांत बाहेर आला ॥ म्हणे द्वार खोली तदा राधिकेला ॥ असें ऐकतां वाक्य कानीं तयाचें ॥ भयें सूकलें मूख या राधिकेचें ॥ १५ ॥ करी प्रार्थना सान होईं मुरारी ॥ उभा राहिला कांत येऊनि द्वारीं ॥ त्वरें वाढतां वेळ नाहीं मला गे ॥ कसा सान होऊं मला सांग तूं गे ॥ १६ ॥ जरी असतो सान गे थोर होतो ॥ कसा मी अतां सान होऊं सखे तो ॥ असें ऐकतां लोचनीं वाहे पाणी ॥ गळाली मति ती रडे दीनवाणी ॥ १७ ॥ अशी प्रार्थना करिता कृष्णजीला ॥ मूर्च्छा दाटलीसे तिये राधिकेला ॥ स्वयें नीजलीलें जया जन्म झाला ॥ त्वरें वंदिलें लहान व्हावे तयाला ॥ १८ ॥ हरी बालक होउनीया त्वरेंसी ॥ करें थापटी उठवी राधिकेसी ॥ कसें रूप हें झणि पाहे मला गे ॥ कशी नीजली झोंप आली तुला गे ॥ १९ ॥ असें बोलतां राधिकेसी हरीनें ॥ नेत्र उघडीले तया राधिकेनें ॥ तया पाहतां हर्ष आनंद झाला ॥ त्वरें काढिलें द्वारिचे आडण्याला ॥ २० ॥ बहू क्रोध आला तया गौळियासी ॥ म्हणे येवढा वेळ कां लाविलासी ॥ स्वयें घेऊनी नीजलें कान्हया हो ॥ तया प्रार्थिता झोंप आली मला हो ॥ २१ ॥ पुढें देखिला सावळा गौळियानें ॥ म्हणे बाळ गे रूप सौंदर्य तान्हें ॥ सदा घेऊनी यांस यावें घराला ॥ मनीं हर्ष झाला तदा राधिकेला ॥ २२ ॥

समाप्त

प्रकाशक : अरुण ज्ञानेश्वर पाठक

जगदीश्वर बुक डेपो,

माधवबाग, मुंबई ४०० ००४

फोन : ३६३५०२

किंमत २ रुपये